**महाराष्ट्र राज्य अनुसुचित जाती जमाती आयोगावरील अस्थायी पदांना मुदत वाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

शासन निर्णय क्रमांकः सीबीसी-१०/२००६/प्र.क्र. ५७६ / मावक

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०००३२.

दिनांकः १० ऑक्टोबर, २०१९

वाचाः-

१) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग विभाग,क्र.-रामाअ- ००३/प्र.क्र.१७५/मावक-१, दि. १ मार्च, २००५.

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभाग,क्रमांक-सीबीसी- १०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि. २ डिसेंबर, २००६

३) शासन निर्णय, सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय्य विभाग,क्रमांक- सीबीसी-१०/२००६/प्र.क्र.५७६/मावक ५, दि. ३० जानेवारी, २०१८

४) शासन निर्णय ,वित्त विभाग क्र-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६ आ.पु.क.दि.०५ मार्च, २०१८

५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक सीबीसी/१०/२००६ /प्र.क्र.५७६ / मावक दि. २८ मार्च, २०१८

६) शासन निर्णय, क्रमांक वित्त विभाग क्र.पदनि /२०१६/प्र.क्र.८/१६ आ. पु. क. दि.०७ सप्टेंबर, २०१८

७) शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.२१ फेब्रुवारी,२०१९

८) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक सीबीसी/१०/२००६ /प्र.क्र.५७६ / मावक दि. २५ मार्च, २०१९

९) शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.११ सप्टेंबर,२०१९

प्रस्तावनाः-

अनुसूचित जाती जमातीच्या सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक, सांस्कृतिक व राजकीय सद्यस्थितीचा अभ्यास करून शासनास उपाययोजना सूचविण्यासाठी सामाजिक न्याय विभागाच्या दि.१/३/२००५ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र अनुसूचित जाती/ जमाती आयोगाची स्थापना करण्यात आली. सदर आयोगावरील अध्यक्षांबरोबरच आयोगाची मुदत दिनांक ३० जुन, २००९ रोजी संपुष्टात येणार होती. तथापि सदर आयोगामार्फत शासनास काही अहवाल सादर करावयाचे असल्याने सदर आयोगास संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आलेली आहे. त्यास अनुसरून आयोगाच्या पदांना सुध्दा वेळोवेळी संदर्भाधिन पत्रान्वये मुदत वाढ देण्यात आलेली आहे. सदर अस्थायी पदांना माहे ०१ मार्च,२०१९ ते माहे ३०सप्टेंबर,२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती. तसेच माहे ०१ ऑक्टोबर २०१९ ते माहे २९फेब्रुवारी,२०२० मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती..

शासन निर्णयः-

राज्य अनुसूचित जाती/ जमाती आयोगाकरीता अधिकारी/कर्मचारी वर्गाची मंजूर ५३ पदापैकी विवरणपत्रात दर्शवलेली २७ पदे प्रथम टप्प्यात भरण्यास दिनांक २ डिसेंबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर एकूण २७ अस्थायी पदांना दि. ०१ /०३/२०१९ ते दि. ३०/०९/२०१९ पर्यंत किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तो पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र. ०८ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. आता आयोगाच्या सदर २७ अस्थायी पदांना संदर्भ क्र.०९ येथील शासन निर्णयान्वये दि. ०१/१०/२०१९ ते दि. २९/०२/२०२० पर्यंत किंवा शासनाने पुढील आदेश होईपर्यंत जे आधी घडेल तोपर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या पदावरील येणारा खर्च सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदीमधून “ मागणी क्रमांक एन-३, २२२५-अनुसूचित जाती अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ अनुसूचित जातीचे कल्याण, ८०० इतर खर्च (०१) (०३) महाराष्ट्र राज्य अनुसुचित जाती आयोग (२२२५-४०७-१) ” या लेखाशिर्षातंर्गत भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२) /२००४/वित्तिय सुधारणा-१, दि. ४/१०/२००४ मधील तरतुदीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१११२५६२७२८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINGLE DINESH RAMCHANDRA

Digitally signed by DINGLE DINESH RAMCHANDRA
DN: CN = DINGLE DINESH RAMCHANDRA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SOCIAL JUSTICE AND SPECIAL JUSTICE DEPT
Date: 2019.10.11 12:58:47 +05'30'

**( दि.रा.डिंगळे )**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई ४०००१८
२) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई ४०००१८
३) वरीष्ठ संशोधन अधिकारी, महाराष्ट्र राज्य अनुसूचित जाती जमाती आयोग,प्रशासकीय इमारत, पहिला मजला, डेअरी विभाग, वरळी सी, फेस, मुंबई ४०००१८
४) आयुक्त समाजकल्याण , महाराष्ट्र राज्य, पुणे
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेता / लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवासी व लेखा अधिकारी, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) उप सचिव,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०)उप सचिव,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवड नस्ती, मावक

# विवरणपत्र

शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः सीबीसी- ०/२००६/प्र.क्र.५७६/मावक
दिनांकः-१० ऑक्टोबर, २०१९

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या | वेतनश्रेणी (रूपये) |
|---|---|---|---|
| १. | सदस्य सचिव (सह सचिव दर्जा) | १ | ७८८००-२०९२०० (एस-२५) |
| २. | सह संचालक (उप सचिव दर्जा) | १ | ७८८००-२०९२०० (एस-२५) |
| ३. | वरीष्ठ संशोधन अधिकारी | १ | ६७७००-२०८७०० (एस-२३) |
| ४. | अतिरिक्त पोलीस अधिक्षक | १ | ६७७००-२०८७०० (एस-२३) |
| ५. | पोलिस निरिक्षक | २ | ४९१००-१५५८००( एस-१८) |
| ६. | स्वीय सहाय्यक | १ | ४४९००-१४२४००( एस-१६) |
| ७. | लघुलेखक उच्चश्रेणी | २ | ४१८००-१३२३००( एस-१५) |
| ८. | सहाय्यक लेखा अधिकारी | १ | ४१८००-१३२३००( एस-१५) |
| ९. | कार्यालयीन अधिक्षक | १ | ३८६००-१२२८००( एस-१४) |
| १०. | लघुलेखक (निम्नश्रेणी) | १ | ३८६००-१२२८००( एस-१४) |
| ११. | सांख्यिकी अधिकारी | १ | ३५४००-११२४००( एस-१३) |
| १२. | संशोधन सहाय्यक | २ | २९२००-९२३०० एस-१०) |
| १३. | सहाय्यक (विधी) | १ | ९३००-३४८०० |
| १४. | वरीष्ठ सहाय्यक | २ | २५५००-८११००( एस-८) |
| १५. | लिपिक टंकलेखक | २ | १९९००-६३२०० (एस-६) |
| १६. | बिल लिपीक | १ | १९९००-६३२००(एस-६) |
| १७. | वाहन चालक (कंत्राटी) | २ | ४०००/- |
| १८. | शिपाई | ४ | १५०००-४७६०० (एस-१) |
| | एकूण | २७ | ---- |

DINGLE DINESH RAMCHANDRA

Digitally signed by DINGLE DINESH RAMCHANDRA
DN: CN = DINGLE DINESH RAMCHANDRA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SOCIAL JUSTICE AND SPECIAL JUSTICE DEPT
Date: 2019.10.11 12:59:03 +05'30'

( दि.रा.डिंगळे)
सहसचिव,महाराष्ट्र शासन